नेहरू बाल पुस्तकालय

# कहाणी वर्तमानपत्राची

लेखक

**चंचल सरकार**

अनुवाद

दिनकर गांगल





**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

Registered No. M 1092

# ఆంధ్రపత్రిక

ప్రతిదినము ప్రకటింపబడును.

VOL. I | No. 1

దినపత్రిక

अमृतांजन.

అమృతాంజనము

వారపత్రిక

ISBN 81-237-1753-9

पहिली आवृत्ती : 1989 *(शके* 1911)
सहावी आवृत्ती : 2003 *(शके* 1924)



**रु. 10.00**

पृष्ठ क्र. 38-39, 40-41, 42-43
वरील छायाचित्रे 'द हिंदू' च्या सौजन्याने
पृष्ठ क्र. 32-33, 35-36, 37
वरील छायाचित्रे 'द स्टेट्समैन' च्या सौजन्याने

The Story of Our Newspapers *(Marathi)*

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट,
इंडिया, ए-5 ग्रीन पार्क, नवी दिल्ली-110 016 यांनी
प्रकाशित केले.

# १ कहाणी वर्तमानपत्राची

सकाळी सकाळीच दारातून काहीतरी आत सारल्याचा किंवा टाकल्याचा आवाज येतो. आपण सवयीनं उठतो, दाराजवळ जाऊन 'पेपर' उचलतो. आता शहरात उंच इमारती असतात; ही वर्तमानपत्रवाली पोरं अशी हुशार की दुसऱ्या-तिसऱ्या मजल्यापर्यंतच्या घरांमध्ये तळमजल्यावरुन अचूक पेपर भिरकावतात, आणि तो पडतो पण योग्य घरात, योग्य ठिकाणी. पेपर येणं ही दिवस सुरू झाल्याची पहिली खूण असते. विंबल्डनला काय झालंय किंवा रोव्हर्स करंडक अंतिम सामन्याचा निकाल काय, हे तुम्ही उत्सुकतेने पाहू लागता, तोच तुमचे आई-बाबा, झटपट आवरण्याची आठवण करून देतात - शाळेला जाण्यासाठी बस पकडायची असते ना! त्यांना मात्र सकाळी सकाळी पेपर वाचता येतो. त्यांच्या आवडत्या गोष्टी म्हणजे पंतप्रधानांचं लोकसभेतलं भाषण किंवा बुंदेलखंडात पडलेल्या धाडसी दरोड्याची हकीगत. एकाद्या सकाळी 'पेपर' आला नाही तर घरातल्या प्रत्येकालाच काहीतरी बिनसल्यासारखं वाटतं.

आजचं ताजं वर्तमानपत्र दुसऱ्या दिवशी मात्र रद्दी होतं. स्वयपाकघरातील फडताळात डब्यांखाली अंथरायला नाही तर काही वस्तू बांधून द्यायला ते आईच्या ताब्यात जातं. वर्तमानपत्राचं आयुष्य फक्त एक दिवसाचं.

भारतातील बहुसंख्य वर्तमानपत्रं सकाळीच प्रकाशित होतात. मुंबई, दिल्ली

येथे संध्याकाळची वर्तमानपत्रं आहेत, पण सर्वसाधारणपणे भारत हा सकाळच्या वर्तमानपत्रांचा देश आहे असं म्हणता येईल. त्यामुळे ही वर्तमानपत्रं छापली जातात भररात्री.

छोट्या गावी राहाणाऱ्यांची एक पंचाईत असते. त्यांना त्या त्या गावचं वर्तमानपत्र मिळतं ते सकाळी, पण मुंबई- पुण्याकडची वर्तमानपत्रं येऊन पोचतात ती दुपारी किंवा रात्री; आणि ती सुध्दा बऱ्याच वेळा त्या वर्तमानपत्रांच्या डाक आवृत्त्या असतात. त्यामध्ये कालच्या बातम्या असतात. वर्तमानपत्राच्या भाषेत खरं तर त्या 'बातम्या'च राहिलेल्या नसतात. पण या छोट्या गावातल्या लोकांनाही मुंबई, दिल्ली, मद्रास यासारख्या शहरांत राष्ट्रीय पातळीवर काय घडलंय हे सविस्तर वाचायला हवं असतं.

एवढ्या सकाळीच तुमच्या दारी वर्तमानपत्रं यावं यासाठी आदल्या दिवशी आणि रात्रीही किती लोक त्यात गुंतलेले असतात याची कल्पना आहे का तुम्हाला? रोज, अगदी रविवारीसुध्दा या मंडळींचा कामाचा कारखाना चालूच असतो. आज वर्तमानपत्रं छापलेली असतात, परंतु त्यांचा जन्म हस्तलिखित स्वरूपात झाला.

## प्रारंभ

ज्युलियस सीझरच्या अधिपत्त्याखालील रोमन साम्राज्यात आजच्या वर्तमानपत्राचा जन्म झाला. सीझर रोज हस्तलिखित घोषणा काढायचा. त्यांना म्हणत - ॲक्टा दिडरना म्हणजे रोजच्या घटना. ख्रिस्तपूर्व ५९ मध्ये ॲक्टा सिनटॉस नावाने हस्तलिखितं येऊ लागली. त्यामध्ये असत ते सिनेटमधील (लोकसभेतील) चर्चांचे वृत्तांत. ही हस्तलिखितं लोकांना वाचायला सोयीचं होईल अशा जागी भिंतींवर चिकटवली जात. पण आपल्या साऱ्याच गोष्टी लोकांना कळतायत हे पाहून सरकारी अधिकारी, राजकारणी नाराज झाले. त्यांनी ही घोषणापत्रं स्थगित केली. सेन्सॉरशिपचं आरंभीच्या काळातलं हे उदाहरण म्हणता येईल.

युरोपात पंधराव्या शतकात छापखाने वापरात आले. मात्र त्याच्या बऱ्याच आधी चीनमध्ये छपाईचं तंत्र अवगत झालं होतं. यामुळे छापलेला शब्द हे दळणवळणाचं, संवादाचं फार महत्वाचं साधन बनलं. बातमीपत्रं जलद गतीनं आणि सहजपणे छापली जाऊ लागली. यानंतर त्यांचं वर्तमानपत्रात रूपांतर स्वाभाविकपणेच झालं.

सोळाव्या शतकात पहिलं वर्तमानपत्र अवतरलं. त्यामध्ये मुख्यतः व्यापारविषयक बातम्या होत्या. त्यानंतर त्यात आल्या राजकीय बातम्या. कारण सरकारच्या निर्णयांचा व घोषणांचा व्यापारी व व्यापार यांवर सरळसरळच परिणाम होत असतो.

दि ट्रू एन्काउंटर ऑफ दि बॅटल फ्लॉडन फिल्ड या नावानं १५१३ मध्ये पहिली 'युध्दकथा' प्रसिध्द झाली ती वृत्तांत पुस्तिकेच्या स्वरूपात. येथेच आजच्या वर्तमानपत्राचा प्रारंभ दिसतो. त्यामध्ये व्यापारी व राजकीय बातम्याच नव्हे तर आज ज्याला वर्तमानकालीन घटनांवरील टिकाटिप्पणी म्हणतो त्याची बीजं दिसतात. सर्वांना रसपूर्ण वाटेल असं पहिलं वर्तमानपत्र १६०९ मध्ये जर्मन भाषेत प्रकाशित झालं.

# २ भारतातील वर्तमानपत्रे

भारतातील मुद्रण आणि वितरण यांचा इतिहास फार जुना नाही. मोहरा किंवा दगडशिलांवर कोरलेली अशोकाची आज्ञापत्रं यांना, संदेश वहनासाठी चोखाळलेला कथित शब्दापलीकडील वेगळा मार्ग असं जरूर म्हणता येईल. पण आपल्याकडे मुद्रणयंत्रासारखं काही तयार झालं नव्हतं कापडावर ठश्यांच्या सहाय्यानं छापण्याचं .पल्याकडे जुन्या काळापासून अवगत आहे. तथापि छपाई आणि संदेशवहन यांच्यामध्ये आपण कधीच काही प्रगती केल्याचं दिसत नाही. महत्वाचे संदेश आपल्याकडे दूतांमार्फत पाठविले जात. त्यांची एक साखळीच असे. गावगप्पा पसरत त्या भटक्या कलाकारांमार्फत. मुसलमानी साम्राज्यात खबरे असत. ते गावोगावची हकीगत सम्राटाला लिहून सांगत असत. त्यात त्यांना दरबारात मोठा हुद्दा असे.



मोहंजोदडोतील शिक्का

पोर्तुगीज धर्मप्रचारकांनी १५५० मध्ये भारतात पहिलं मुद्रणयंत्र आणलं. त्याआधी सुमारे शंभर वर्षे युरोपात मुद्रणयंत्रांचा शोध लागला होता. पोर्तुगीज धर्मप्रचारकांनी या यंत्रावर धर्मग्रंथ आणि पत्रकं छापण्यास सुरुवात केली. यामुळे त्यांचं ख्रिश्चन धर्मप्रसाराचं काम सोपं होऊ लागलं. भारतातील पहिली वार्तापत्रं छापून तयार व्हायला त्यानंतर बराच काळ जावा लागला. ब्रिटिशांनी कलकत्ता आणि मद्रास येथे आपली प्रांतऑफीसं स्थापली तेव्हा त्यांनी इकडच्या हकिगती तिकडे आणि तिकडच्या हकिगती इकडे कळण्याकरिता वार्तापत्र उपयोगात आणली.

ईस्ट इंडिया कंपनीचे ते दिवस धाडसाचे होते. युरोपीयन माणसं भारतात येत तीच भाग्योदयाच्या लालसेनं. त्यांच्यापैकीच एक जेम्स ऑगस्टस हिकी यानं १७८० मध्ये बंगाल गॅझेट वा कलकत्ता जनरल ॲडव्हर्टायझर या नावाचं वर्तमानपत्र काढलं. त्याचं त्यानं वर्णन केलं ते असं – राजकीय आणि व्यापारी बातम्या देणारं साप्ताहिक. हे सर्व पक्षांना खुलं आहे. पण त्यावर प्रभाव मात्र कुणाचा नाही. जाहिराती, व्यापारी बातम्या आणि सरकारातल्या किंवा पक्षातल्या चविष्ट हकिगती यांचं मिश्रण या गॅझेटमध्ये असे. पण तें बहुधा सरकारला पटलं नसावं, कारण दोनच वर्षांत गॅझेट बंद पडलं आणि हिकीसाहेब यांची तुरुंगात रवानगी झाली. आणखीही काही वर्तमानपत्रं निघाली, पण त्यांवर सरकारची बारीक नजर असे, आणि काही वेळा त्यांतील लेखनात काटछाट सुचविली जाई. एक लक्षात ठेवलं पाहिजे की त्यावेळची ही वर्तमानपत्रं युरोपियनांनी युरोपियनांसाठीच चालविलेली असत.

पहिलं भारतीय वर्तमानपत्रं सुरु केलं ते गंगाधर भट्टाचार्य यांनी. त्यांनी १८१६ मध्ये बंगाल गॅझेट बंगाली भाषेत प्रसिध्द केलं. त्यानंतर आले राजा राम मोहन रॉय... त्यांनी समाजसुधारणेच्या आपल्या सगळ्या कल्पना पारशी आणि इंग्रजी भाषांतील छापील माध्यमं वापरूनच प्रसारित केल्या. त्यामुळे समाज खूपच प्रभावित झाला. खुद्द भट्टाचार्यजी सुध्दा राम मोहन रॉय यांच्या प्रभावाखाली होते. सतीच्या चालीसारख्या अनिष्ट प्रथांविरूध्द रॉय यांनी कडाडून लिहिलं. ते सरकारवर टीका करीत आणि पाश्चिमात्यांच्या चांगल्या राजकीय व सांस्कृतिक संकल्पना बंगाली लोकांनी उचलून धराव्या असं आवाहन करीत. आधुनिक भारतीय पत्रकारिता स्थिरावत होती. एवढ्यात १८५७ चं क्रांतियुध्द आलं. वर्तमानपत्रांची प्रगती काही काळ मंदावली.



रामोहन रॉय



सुरेन्द्रनाथ बॅनर्जी

युध्दानंतर सरकारनं छपाईसंबंधात अधिक कडक कायदेकानून लागू केले. त्यावर बऱ्याच इंग्लीश जाणकारांनी देखील टीका केली. वर्तमानपत्र स्वतंत्र असावं असं त्यांचं मत होतं. यामुळे लोकांच्या भावनांना मोकळीक मिळते आणि सरकारलाही माहिती कळते असं त्यांचं म्हणणं होतं.

सरकारचं कडक नियंत्रण होतं तरीदेखील दादाभाई नौरोजी यांचा 'रास्त गोफ्तार' किंवा सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांचा 'बेंगाली' यासारखी वर्तमानपत्रं प्रसिध्द होत राहिली. अनिष्ट सामाजिक चालीरीतींविरूध्द मुख्यतः त्यांत लेखन असे. यामध्येच १९१९ साली सुरु झालेल्या 'यंग इंडिया' या साप्ताहिकाचा समावेश करता येईल. त्याचे संपादक होते मोहनदास करमचंद गांधी. एक वकील, एक सामाजिक आणि राजकीय कार्यकर्ते. त्यांना छापील शब्दाची ताकद कळली होती. त्यांनी अक्षरशः शेकडो लेख लिहून ते 'यंग इंडिया' मध्ये प्रकाशित केले. अखेरीस त्या लेखनामुळे त्यांना १९२२ मध्ये कारावास सहन करावा लागला.

त्यांचं पत्रकारांना सांगणं असे की छापखाने (सरकारनं) बंद केले तरी नाउमेद होऊ नका. हातांनी लेखांच्या प्रती करा आणि वाटा. कशाही पध्दतीनं लोकांना

Subscription yearly Rs. 6.
„ Half yearly Rs. 3.

THE SIMLA VISIT

# YOUNG INDIA

*Published Every Wednesday.* Edited by M. K. Gandhi.

New Series | Vol. III. No. 21 | AHMEDABAD, WEDNESDAY, MAY [illegible], 1921 | Price Two Annas Per Copy.

## Notes.

**Moulana Mahomed Ali**—I observe that the *Indian Social Reformer* rates me for not having said anything about Moulana Mahomed Ali's speech at Madras, and not having criticised Lala Lajpatrai's at Bombay. I must not answer the inferences and the innuendoes contained in the paragraph. Critics do not know under what difficulties I edit *Young India*. I rarely read newspapers. I cannot even get them during my incessant traveling. But having read this criticism, I purposely procured at Simla a copy of the Moulana's speech. I have only just read it. I have [illegible] read the paragraph criticised, and I am of opinion that it contains nothing in it that is objectionable. The speech is certainly not inconsistent with his interview at Allahabad. In the Madras speech, he simply states the Muslim position. In the Allahabad interview, he has accepted my application and restriction of the [illegible] Muslim [illegible]. There is no doubt that if the Mussalmans could take [illegible], they would [illegible] of Islam. The difficulty arises be[illegible] belief in the impossibility of the Afghans invading to defeat the British without wishing at the same time to occupy India. That may be and will be a good reason for Mussalmans, if they are true to India, not [illegible] the Afghans even if they were able but we may not dispute the theoretical religious right of Mussalmans to state their correct position. We can only honour them for it. The two great qualities of the brothers are their bravery and sincerity. And I can read nothing but these two qualities in the Madras speech.

**Lala Lajpat Rai**—Let me take the *Indian Social Reformer* into the secret of my methods. My assistant drew my attention to the hostile criticism of Lalaji's speech and asked me whether I wished to say anything upon it. I had not the text of his speech before me, nor had seen any criticism. I therefore wrote to Lalaji, asking him to enlighten me on the matter, and suggesting that he should apologise, if a single hasty word was uttered. It has been my privilege on close acquaintance to find him generous, forgiving and frank. He said in his letter that his Bombay speech was a specially considered utterance, and that he had not attacked any person in it. He had only dealt with the action of the Moderates as a party. He sent me the cutting for my opinion. This was whilst I was in Sindh. I was unable to read it and had forgotten all about it, till the *Reformer's* rebuke reminded me of it. I have now read Lalaji's speech and have much pleasure in stating that I find nothing offensive or discourteous in it. It is undoubtedly in Lalaji's fighting style. It is a party speech. He has adopted, by long residence in the west, the western form of criticism. But it is best western form. There is nothing vulgar in it. His charges are not unjustified by the conduct of the Moderate ministers. His worst charge is that they have merged themselves in the bureaucracy. It is a serious charge to make but the instances adduced by him surely prove it. The Moderates may retort, if they choose, that outsiders cannot appreciate the difficulties of the ministers. But that is just what proves the error of the great leaders who find themselves allied with the Government. They should have known that such would be their lot [illegible] they should now know by experience, that it is [illegible] being ministers until they have an effective control over the Government policy. All the repression that is now going on, is almost as bad as before. It makes little difference that now there is the farce of a trial. The fact is, that most of the political sections of the Penal Code are such as to bring almost every non-co-operation speech under them. I believe that if I was charged, I should have to plead guilty to the charge of sedition. It is the duty of a non-co-operator to preach disaffection towards the existing order of things. Non-co-operators are but giving disciplined expression to a nation's outraged feelings. I should like to see a considered reply to Lala Lajpat Rai's strong indictment. In my humble opinion, the speech of Lala Lajpat Rai does not betray any loss of temper, and is quite in keeping with the advice he tendered the youth of the country in his concluding paragraphs.

**'A Messenger of God'**—I have received a cutting, in which I am reported to be credited with being a messenger of God, and I am asked whether I claim to have any special revelation from God. I have already dealt with the miracles attributed to me. As to this the latest charge, I must disown it. I pray like every good Hindu. I believe that we can all become messengers of God, if we cease to fear man and seek only God's Truth. I do believe I am seeking only God's Truth and have lost all fear of man. I therefore do *feel* that

केसरी.

वर्ष १. पुणें :- मंगळवार तारीख २५ जानेवारी १८८१ अंक ४.

नवनीताची नवीन आवृत्ति.

केसरीचे पहिले पान

REGISTER NO. 6632.

ANNUAL SUBSCRIPTION RUPEES 6.

SINGLE COPY ANNAS 2

A WEEKLY REVIEW

OF

National Religion, Literature, Science, Philosophy, &c,

No. 3.

CONTENTS.

OFFICE : 14 SHAM BAZAR STREET, CALCUTTA

कर्मयोगीचे पहिले पान

त्यांच्यावरील अन्यायाची माहिती कळली पाहिजे आणि स्वयंशासनाची महती पटली पाहिजे असं त्यांचं म्हणणं होतं. परकीय सत्ताधाऱ्यांविरुध्द लढण्यासाठी एक शस्त्र म्हणून वर्तमानपत्राकडे पाहणारा आणखी एक थोर पुरुष म्हणजे लोकमान्य बाळ गंगाधर टिळक. त्यांनी केसरी आणि मराठा ही वर्तमानपत्रं सुरु केली. केसरीचा पहिला अंक निघाला १८८१ साली. सर्वसामान्यांपर्यंत पोचण्याचं त्याचं उद्दिष्ट होतं. टिळकांनी स्वतःच सांगितलं आहे की ब्रिटिशांवर हल्ला चढविण्याची शैली त्यांनी उचलली ती शिशिरकुमार घोष यांच्याकडून. या अर्थानं टिळकांचे ते गुरु होते.

या राष्ट्रवादी वृत्तपत्रांशिवाय एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला व अखेरीला इतरही काही वर्तमानपत्रं निघाली. त्यातील काही आजही आहेत. काळाच्या ओघात ती सुदृढ झाली, स्थिर पायावर उभी राहिली आणि आज साखळी वर्तमानपत्रं म्हणून प्रसिध्द आहेत. त्यांची नावं तुम्हाला माहीत असतील, पण त्यांचा प्रारंभ किती मजेदार होता हे कदाचित तुम्हाला ठाऊक नसेल. त्यापैकी एक मद्रासचा 'द हिंदू' सुरु झाला १८७८ साली. आता त्याला शंभर वर्ष उलटून देखील गेली. ज्यांनी ही वर्तमानपत्रं सुरु केली ती फार थोर विचाराची माणसं होतीच,आणि त्यांचं साहसही प्रचंड होतं. त्यांच्यापैकी काही इंग्रजी लोक होते. त्यानीही वृत्तपत्रस्वातंत्र्य आणि देशाचं स्वातंत्र्य यासाठीच्या लढ्यात वर्तमानपत्राच्या सहाय्यानं सहभाग घेतला.

अमृतबझार पत्रिकेची कहाणी फारच रोमहर्षक आहे. शिशिरकुमार घोष आणि त्यांचे आठ भाऊ यांनी १८६८ मध्ये कलकत्त्यात ३२ रुपयाला एक जुनं मुद्रणयंत्र विकत घेतलं. ते त्यांनी आता बंगला देशात असलेल्या जेस्सोर जिल्ह्यातील अमृत बझार या आपल्या गावी नेऊन बसविलं. त्यानी पत्रिका सुरु केली. सर्वसामान्य माणसावरील अन्यायाविरुध्द तीमध्ये अत्यंत कडक भाषेतील लेखन असे. स्वाभाविकच त्यांना त्रास होई. कधी छापखाना बंद करावा लागे. पुढे १८६९ मध्ये त्यांनी काही स्तंभ इंग्रजीमधून छापण्यास सुरुवात केली. आणि भाषिक वर्तमानपत्रांविरुध्द अँग्लो-व्हर्नाक्युलर प्रेस कायदा लागू होणार असे दिसताच रातोरात त्यांनी इंग्रजी वर्तमानपत्र सुरु केलं आणि सरकारी नियंत्रणाचा दट्ट्या बाजूला ठेवला.

'द बॉंबे टाइम्स'चे संपादक होते रॉबर्ट नाइट. हे आणि इतर तीन वर्तमानपत्रं मिळून निर्माण झाला टाइम्स ऑफ इंडिया... त्याचा जन्म १८६१ चा. त्याचे संपादक थॉमस बेनेट-यांनी रॉबर्ट नाइट यांची परंपरा उत्तम चालविली. टाइम्स ऑफ इंडियाचे सर्व संपादक स्वतंत्र बुध्दीचे होते, त्यामुळे हे वर्तमानपत्र झपाट्यानं स्थिरावलं. प्रारंभीच्या काळात देखील या वर्तमानपत्राचं वार्ता संकलन व्यापक आणि विविध मतप्रदर्शन

करणाऱ्या वार्तापत्रांनी समृध्द असे. 'बॉम्बे क्रॉनिकल'चे खंदे संपादक बेंजामिन गाय हॉर्निमन हे टाईम्स ऑफ इंडियाला 'बोरिबंदरची बुढ्ढी' म्हणत. मात्र तरीसुध्दा त्याना टाइम्स ऑफ इंडियाशी स्पर्धा कधी करता आली नाही. त्यांच्याइतकं जुनं नाही पण तरीदेखील ऐतिहासिक महत्वाचं वर्तमानपत्र म्हणजे नॅशनल हेराल्ड. ते १९३६ मध्ये सुरु झालं, आणि त्याच्या संचालक मंडळाचे अध्यक्ष होते जवाहरलाल नेहरू. खरं तर पक्षांनी चालविलेली वर्तमानपत्रं फार काळ टिकत नाहीत. पण या नियमास अपवाद असलेल्या काहींपैकी एक आहे नॅशनल हेराल्ड.

त्या काळात बरेच धाडसी आणि बुध्दिमान लोक पत्रकारितेकडे आकृष्ट झाले. बेंजामिन गाय हॉर्निमन यांचा भारतीय स्वातंत्र्यलढ्याला पाठिंबा असे. बंगालच्या फाळणीविरुध्द १९०५ मध्ये झालेल्या निदर्शनांत त्यानी भाग घेतला. त्यावेळी धोतर नेसून रस्त्यातून ते अनवाणी चालत गेले. विलिंग्डन यांचं स्मारक उभारण्याविरुध्द उभारलेल्या मोहिमेचं त्यांनी नेतृत्व केलं. आणि १९१८ मध्ये एफ्ल्युएंझाची जबरदस्त साथ आली तेव्हा त्यांनी घरोघरी जाऊन लोकांना मदत केली. रौलट कायद्याविरुध्द त्यांनी सत्याग्रह केला आणि अमृतसर हत्याकांडाबद्दल त्यांनी विरोधी लेखन केलं तेव्हा ते आजारी होते. तरी त्यांना बाहेर खेचून नेऊन १९१९ साली भारताबाहेर पाठविण्यात आलं. ते १९२१ साली भारतात पुन्हा आले ते परवानगी विनाच!

किम, द जंगल बूक आणि बॅरक रुम बॅलॅडस्‌चे लेखक रुडयार्ड किपलिंग हे लाहोर येथील सिव्हील अँड मिलिटरी गॅझेटच्या संपादकीय मंडळावर होते. निरस सरकारी वृत्तांतांची मुद्रितं तपासण्यात त्यांचा बराच वेळ जात असे. ती वाचता वाचता स्वाभाविकपणेच त्यांचा सरकारविरोधी उपरोध तयार झाला असावा. 'डिपार्टमेंटल डिट्टीज' या शीर्षकानं नंतर प्रकाशित झालेल्या त्यांच्या कविता प्रथम आल्या त्या सिव्हील अँड मिलीटरी गॅझेटमध्ये. पण त्यांच्या उपरोधिक लेखनानंन त्यांचे ज्येष्ठ नाराज झाले. त्यांची बदली अलाहाबादच्या 'द पायोनियर'मध्ये करण्यात आली. तेथे त्यांनी कविता आणि उपहासात्मक कविता लेखन चालूच ठेवलं. पण वृत्तपत्र हा मामला गंभीर असल्याचा दावा करुन किपलिंग यांच्या लिखाणाला फारशी दाद देण्यात आली नाही. नंतरच्या काळात 'द पायोनियर'चे हे अंक अमेरिकेत भरमसाठ किमतीला

THIS MADNESS AND DEATH

**बेंजामिन गाय हॉर्निमन , नॅशनल हेरॉल्ड मध्ये लिहिलेला पं. नेहरूंचा एक लेख.**

विकले गेले. 'द सिव्हील अँड मिलीटरी गॅझेट' मध्ये त्याच्या स्मृत्यर्थ एक खोली आहे असे सांगतात.

अशा तऱ्हेनं केवळ भारतीयांनीच संपादित केलेल्या, नव्हे तर काही ब्रिटिशांनी चालविलेल्या भारतीय वर्तमानपत्रांचा भारतीय स्वातंत्र्यलढ्याशी सरळ व प्रत्यक्ष संबंध होता. यापैकी काही वर्तमानपत्रांची नावं माहिती असायला हवी. केसरी, मराठा, इंडियन रिव्हयू, बॉबे क्रॅनिकल, लिबर्टी, फॉरवर्ड, अॅडव्हान्स, सर्व्हंट ऑफ इंडिया, जस्टीस, बेंगाली, वंदे मातरम्, अल् हिलाल, स्वराज्य, हितवाद यापैकी काही अद्याप चालू आहेत. पण बहुतेकांची नावं इतिहासात नोंदली गेली आहेत.

जगभरच्या गेल्या काही शतकांतील वृत्तपत्रांचा इतिहास पाहिला तर असं दिसून येईल की जुलमीतलं जुलमी राज्यदेखील लोकांची मुक्त आविष्काराची उर्मी दाबून ठेवू शकत नाही. कल्पना, विचार सतत तेवते ठेवण्यासाठी वृत्तपत्रांचा चांगला उपयोग होतो आणि लोकांचा जाणून घेण्याचा हक्कही त्यांमुळे अबाधित राहतो. आज वर्तमानपत्रं सारखी निर्माण व तेवढ्याच संख्येनं नाहीशी होत असतात. भारतात बरीच वर्तमानपत्रं आणि मासिकं आहेत. पण या मोठ्या संख्येमुळे उगाच गैरसमजही होतो. दैनिकांचंच उदाहरण घ्या. त्यांचा एकूण खप आहे फक्त नव्वद लाख. देशाच्या अडुसष्ट कोटी लोकसंख्येमध्ये पंचवीस कोटी साक्षर हीच मुळात संख्या लहान. त्यामध्ये एवढासा खप... लोकांना माहिती करुन देण्याचं व्रत कसं पार पडणार?

# ३ वार्तासंकलन आणि संपादक

वार्तासंकलनाचं दालन म्हणजे वृत्तपत्राचा आत्माच. या ठिकाणी शहरातील, देशातील आणि जगातील बातम्या एकत्र होतात. येथूनच वार्ताहर बातम्या मिळविण्यासाठी बाहेर पडतात, आणि पुन्हा येथेच येऊन अथवा टेलिफोन करुन बातम्या देतात. येथेच टेलिप्रिंटरची यंत्रं धडधडत असतात आणि त्यामधून बाहेर पडणाऱ्या कागदावर देशातल्या व जगातल्या महत्वाच्या शहरांमधून बातम्या प्रकट होत असतात. काही वर्तमानपत्रांत टेलिप्रिंटरनं जिल्हाकेंद्रं देखील जोडलेली असतात. टेलिप्रिंटर यंत्रं टाइपरायटरप्रमाणे असतात. फक्त ती विजेच्या तारांनी अथवा रेडिओ लहरींनी जोडलेली असतात. जेव्हा एखाद्या केंद्रामधून उदा. दिल्ली, आपरेटर टेलिप्रिंटरवर त्याला बातमीदारानं दिलेला मजकूर टाइप करतो तेव्हा त्या क्षणी दिल्लीशी टेलिप्रिंटर यंत्रणेनं जोडलेल्या फक्त देशातीलच नव्हे तर साऱ्या जगभरच्या सगळ्या वर्तमानपत्रांमध्ये तो मजकूर जसाच्या तसा मिळतो.

सरकार, उद्योगधंदे वा व्यापारसंस्था यानी काढलेल्या प्रसिध्दीपत्रकांमधून देखील बातम्या मिळतात. बातम्या पुरविणारे आणखी एक ठिकाण म्हणजे वृत्तसंस्था. या ठिकाणी वृत्त प्रतिनिधी आणि वार्ताहर नेमलेले असतात. ते केंद्र कचेरीकडे आपल्या

बातम्या पाठवतात. युनायटेड न्यूज ऑफ इंडिया आणि प्रेस ट्रस्ट ऑफ इंडिया या भारतीय वृत्तसंस्था इंग्रजीमध्ये बातम्या प्रक्षेपित करतात. समाचार भारतीच्या बातम्या हिंदीमध्ये प्रक्षेपित होतात. असोसिएटेड प्रेस (ए.पी. - अमेरिकन) आणि रॉयटर्स (ब्रिटिश) या नाणावलेल्या परदेशी वृत्तसंस्था आहेत. तुम्ही जेव्हा वर्तमानपत्रात बातम्यांआधी वा अखेरीला ही नावं वाचता, तेव्हा समजून चाला की त्या त्या बातम्या त्या त्या वृत्तसंस्थेनं पुरवलेल्या आहेत.

बातम्यांच्या रूपानं शब्दांचा हा जो महासागर तयार होतो तो नीटपणे चालणं, त्यातून प्रसिध्दीयोग्य बातम्या निवडणं, हव्या त्या आकारात त्यांची काटछाट करणं आणि मग त्या वाचकांपुढे आकर्षक पध्दतीनं सादर करणं हे कौशल्याचंच काम आहे. निवड ही करावीच लागते. कारण वर्तमानपत्रात छापण्यासाठी जेवढी जागा असते त्याच्या दुपटीहून अधिक मजकूर रोज वर्तमानपत्राच्या कचेरीत येत असतो. या ठिकाणीच वृत्तपत्राची दिशा आणि संपादकीय कौशल्य महत्वाची ठरतं.

'गरमागरम' बातम्या, प्रासंगिक , लेख, मतं-मतांतरं व्यक्त करणारे स्तंभ. संपादकीय, क्रीडावार्ता, व्यापारबातम्या, जाहिराती, छायाचित्रं वगैरे विविध घटकांचं मिश्रण म्हणजे वर्तमानपत्र असतं. यातले कोणते घटक कोणत्या प्रमाणात दुसऱ्या दिवशीच्या पेपरमध्ये असणार हे ठरविण्यासाठी काही यंत्रणा हवी असते. हे सहसा दिवसभराच्या विविध बैठकांमधून ठरत असतं. संपादक या विविध घटकांशी संबंधित गटांच्या बैठका घेतात. उदाहरणार्थ वृत्तसंपादक, प्रमुख उपसंपादक आणि प्रमुख वार्ताहर यांच्या बैठकीत उद्या कोणत्या महत्वाच्या बातम्या अपेक्षित आहेत आणि त्यानंतरचा घटनाक्रम काम असू शकेल याची चर्चा होते. याच बैठकीत वृत्तपत्रानं कोणत्या बातम्यांचा विशेष तपास करावा याचा विचार होतो आणि वेगवेगळी कामं वेगवेगळ्या लोकांना वाटण्याचं ठरतं.

संपादकीय टीकाटिप्पणी लिहिणाऱ्या सहकाऱ्यांची एक बैठक संपादक रोज घेतो. या ठिकाणी प्रासंगिक महत्वाच्या कोणत्या विषयावर संपादकीय लिहायचं हे ठरविलं जातं. नंतर संपादक विविध विषयांचं विशेष ज्ञान असणाऱ्या मंडळींच्या बैठका घेतो. त्यामध्ये कला, क्रीडा, विभागाचे संपादक असतात तर जाहिरात व्यवस्थापक्र असतो.

कला संपादक छायाचित्रं, इतर चित्रं, आकृत्या ठरवतो. जाहिरात व्यवस्थापक दुसऱ्या दिवशीच्या वर्तमानपत्रात किती जाहिरात आहे हे सांगतो. एव्हाना अुद्याचा 'पेपर' कसा असेल यातील बऱ्याच गोष्टी ठरलेल्या असतात. अर्थात नंतर घडणाऱ्या घटनांनी हे रूप पूर्ण बदललं जाण्याची शक्यता असते. अशी महत्वाची बातमी आली तर संभाव्य बदलासाठी प्रत्येकालाच तयार रहावं लागतं.

## वार्तासंकलनाचे दालन

वर्तमानपत्राच्या संपादकीय विभागात कोण काम करतं हे समजून घेण्यासाठी त्यांना एका मोठ्या दालनात आणून बसवू या. आधुनिक वृत्तपत्रात याच प्रकारे सर्व कर्मचाऱ्यांना एकत्र समावले जातं. त्यातील काही व्यक्तींभोवती फारतर कोचेच्या भिंती असतात व अशा तऱ्हेनं छोट्या खोल्या तयार होतात. पण त्यांना बाहेरचं व बाहेरच्यांना आतलं पूर्ण दृश्य दिसतं. हे मोठी दालन शांत असतं, कारण आधुनिक वीजाणू मुद्रण यंत्रविज्ञानात आवाज नसतोच.

ही मोठीं दालनं दोन भागांत विभागू या. त्यातल्या एका भागात बातम्या एकत्र होतात. दुसऱ्या भागात त्यावर संपादकीय संस्कार केले जातात. बातमीदार रोजच्या घटनांच्या बातम्या मिळविण्यासाठी बाहेर जातात. उदाहरणार्थ समारंभ आधीच जाहीर झालेले असतात आणि वर्तमानपत्राच्या दैनंदिनीत त्यांची नोंद असते. वृत्तपत्रानं स्वतः करविलेल्या विषयावर वृत्तलेख तयार करण्याच्या दृष्टीनं माहिती मिळविण्यासाठी देखील ते बाहेर पडतात. काही वार्ताहर शोधवृत्तांच्या मागावर जातात. समाजातील गैर घटनांचा शोध घेऊन वर्तमानपत्रातून लोकांसमोर त्या सप्रमाण मांडणे ह्या अशा गोष्टींबद्दल काही वेळा लोकं त्यांची प्रशंसा करतात. या मोहिमांचा हेतू असतो. काही वार्ताहर आदल्या दिवशीच्या घटनेचं पुढे काय झालं या तपासात निघतात. काही वार्ताहरांच्या काही गोष्टी बांधील असतात. ते त्या मार्गी लागतात जसं की गुन्हेगारी, न्यायालयं, महानगरपालिका वगैरे ठिकाणी ठरलेले वार्ताहर ठरलेल्या वेळी जाऊन बातम्या आणतात. आता बऱ्याच वर्तमानपत्रांत मुलीही वार्ताहराचं काम करतात. पूर्वी असं नव्हतं. वार्ताहराचं काम कठोर मागण्या करणारं असतं आणि मुली ते अधिक सुकरपणे करू शकतील असंच त्यांनी सिध्द केलं आहे.

प्रत्येक वार्ताहराला प्रारंभी बांधील कामं करावी लागतात. त्यात गुन्हेगारी, न्यायालय, महापालिका अशी क्षेत्रं येतात. त्यानंतर तो स्वतःचं विशेष क्षेत्र ठरवितो. क्रीडावार्ताहर फक्त खेळाच्या बातम्या देतात, तर गुन्हेगारी वार्ताहर गुन्ह्यांच्या. लौकरच त्यांच्या पोलिसांशी ओळखी होतात. गुन्हेगारी जग त्यांना परिचयाचं होतं. याच संपर्काचा त्यांना उपयोग होतो.

पूर्वी वार्ताहराला गरज असे ती फक्त पेन आणि वही याची. कोणत्याही घटनेची माहिती घेऊन परत कचेरीत आल्यावर तो सहसा बातमी टाईप करतो. लघुलेखन हे वार्ताहराचं आवश्यक कौशल्य मानलं जातं. आता वार्ताहर टेप रेकॉर्डर्स वापरतात. भारतीय भाषांतील वार्ताहर विशेषतः मुलाखतींसाठी अजूनही हातांनी मजकूर लिहितात. पण काही भाषांमध्ये टाइपरायटर्सचा अधिक उपयोग होऊ लागला आहे.

वार्ताहरांचा आणखी एक गट असतो. विशेषतः दिल्लीमध्ये त्यांना मोठं नाव असतं – विशेष प्रतिनिधी. त्यांना संसदेच्या आणि भारत सरकारच्या विविध मंत्रालयांच्या बातम्या द्याव्या लागतात. रटाळ भाषणं आणि कंटाळवाण्या चर्चा ऐकत त्यांना बसावं लागतं, पण डोळे उघडे ठेवले तर त्यांना रोमहर्षक घटना वृत्तांत लिहिण्यास मिळते आणि घालवलेल्या वेळाचं चीज होतं. याशिवाय राजनैतिक प्रतिनिधी, औद्योगिक प्रतिनिधी, विज्ञान प्रतिनिधी असे वार्ताहर असतात. अलिकडेच एका वर्तमानपत्रात महिला घडामोडी प्रतिनिधी नेमण्यात आला आहे.

टेलिप्रिंटरवर येणारी, टपालानं येणारी, बातमीदारांकडून येणारी अशा ठिकठिकाणाहून सारख्या बातम्या येत असतात. त्यांच्यावर संपादकीय संस्कार करण्याचं किंवा त्यांचं पुनर्लेखन करण्याचं काम उपसंपादकाचं. येणारा मजकूर चाळायचा, आपल्याला हव्या त्या लांबीइतकी त्यात काटछाट करायची, त्या मजकुराला उत्तम शीर्षक द्यायचं अशी कामं त्याला करायची असतात. पुनर्लेखनाचं काम तर अतिशय कौशल्याचं, परंतु भटकून वार्ताहरी करण्याची सवय झालेल्यांना हे काम फार बैठं वाटण्याची शक्यता आहे. हा स्वभावप्रकृतीचा प्रश्न असतो. काहींना टेबलाशी बैठं काम आवडतं तर काहींना बाहेर पडून लोकांना भेटणं, अधिक ओळखी वाढवणं,



**व्यंगचित्रकार अबू**

माहिती मिळवणं हे काम आवडतं. खरं तर उपसंपादक म्हणून काही काळ काम केल्यानंतर कोणीही चांगला वार्ताहर होऊ शकेल. कारण तरच फारसं शब्दबंबाल न करता सुस्पष्ट लिहिण्यास तो अथवा ती शिकेल. सगळ्या उपसंपादकांनी देखील काही काळ वार्ताहरी करावी. नाहीतर कोणत्या परिस्थितीत बातम्या मिळवाव्या लागतात याची त्यांना कधीच कल्पना येणार नाही.

वर्तमानपत्रामध्ये याशिवाय सहसंपादक असतात. त्यांची संख्या फार नसते. संपादकीय, क्वचित काही स्तंभ लिहिणं हे त्यांचं काम असतं. वाचकांकडून येणारी

पत्रं, बाहेरून लिहिणाऱ्या लेखकांचे लेख पहाणं, तपासणं हे या मंडळींचं काम असतं. एक सहसंपादक बऱ्याच वेळा वर्तमानपत्राच्या रविवार पुरवणीचं काम बघतो.

वृत्तसंपादकाचा दर्जा बघता त्याला एक स्वतंत्र काचेची खोली असायाला हवी. वार्ताहर आणि उपसंपादक यांचा तो अधिकारी असतो. तसा तर वार्ताहरांचा प्रमुख मुख्य वार्ताहर असतो आणि उपसंपादकांचा प्रमुख मुख्य उपसंपादक असतो. वृत्तसंपादकाचे सहसा बाहेरगावी काम करणाऱ्या वृत्तप्रतिनिधींवरही नियंत्रण असते.

पहेली का सही उत्तर देने वालों के नाम

ऐमोफिल ननैया






मजदूर

बाल भारत

मन का संकल्प

एकता का मंदिर

इम्तहान का गोरख धंधा

वर्तमानपत्रातील मुलांचे पान

## अक्षरजुळणी करणाऱ्या वर्तमानपत्रातील संपादकीय कार्याचा तक्ता

संपादक

अग्रलेखाचे लिखाण
संपादकास पत्रे
पुस्तक परिक्षणे
स्तंभ लेखन
संपादकीय पान
विविध सदरे

सहायक संपादक

बातमीदार व प्रतिनिधी

वृत्तसंपादक

राज्य व जिल्हा पातळीवरील
खास वार्ताहर

विशेष वार्ता विभाग : कला, चित्रपट, विज्ञान
विषयक बातमीदार, रेडियो, दूरदर्शन वृत्त प्रतिनिधी

संपादकास साहाय्य करणारे -
कार्यकारी संपादक
व्यंगचित्रकार
वृत्तसंकलक इतर कर्मचारी

प्रमुख वार्ताहर,
वार्ताहर छायाचित्रणकार

प्रमुख उपसंपादक, उपसंपादक,
क्रीडा, व्यापार वगैरे

मुद्रित तपासनीस

जेवढं वर्तमानपत्र मोठं तेवढी त्याची यंत्रणा विस्तृत असते. उपवृत्तसंपादक, विज्ञानसंपादक, छायाचित्र संपादक असेही अधिकारी असतात. पण हे सगळे धागे शेवटी जाऊन पोचतात संपादकाशी. त्याचं काम नेत्याचं आणि सूत्रधाराचं असतं. वाद्यवृंदाचा जसा संचालक तसा वर्तमानपत्राचा संपादक ही तुलना त्यातल्या त्या त जवळची. वाद्यवृंदाच्या प्रत्येक वादकाला संचालक सूचना देतो. त्याप्रमाणे तो त्यांचे स्वतःचे वाद्य स्वतंत्र वाजवतो आणि ते योग्य स्वरमेळामध्ये बसतं.

संपादकाला तर काचेची खोली हवीच. प्रत्येक वर्तमानपत्रामध्ये संपादकाची भूमिका वेगवेगळी असते. एकाद्या वर्तमानपत्रात तो मुख्यतः लिहिणारा माणूस असतो. विषय ठरवायचा, लिहायचे, संपादकीय पाठवायचे आणि मग संपादकीय पानाचे काम पाहायचे. बाकीच्या गोष्टी सहकाऱ्यांवर सोडायच्या अर्थात त्याचं नियंत्रण असणारच. किंवा तो फक्त नियोजनकर्ता असेल आणि त्याचा बहुतेक वेळ आणि कल्पनाशक्ती बातमी कशी आणवयाची, ती प्रसिध्द कशी करायची, तसेच महत्वाच्या विषयावर कसं मतप्रदर्शन व्हायला हवं हे ठरविण्यातच खर्च होईल. तो कदाचित एक ओळ ही लिहिणार नाही. ऐकून नवलच वाटेल, पण ज़गातले काही उत्तम तडफदार संपादक नुसत्या कल्पना डोक्यात घोळवत असतात आणि इतरांना लेखनप्रवृत्त करतात.

मात्र भारतीय संपादक सहसा संपादकीय किंवा स्तंभलेखन पसंत करतात, ते नियोजनास फार वेळ देत नाहीत. काही देशांमध्ये नियोजनकौशल्य असणाऱ्या संपादकांस पसंती असते. भारतातही काही संपादक या बाबतीत अनुकूलता दाखवू लागले आहेत.

# ४ छापखान्यात

वर्तमानपत्र काढणारी माणसं कोण असतात? तुम्हाला वाटेल की याचं फक्त एका शब्दात उत्तर देता येईल - पत्रकार, तर तुमचं थोडंफार बरोबर आहे एवढंच म्हणता येईल.

पत्रकारांनी लिहिलेल्या बातम्या आणि लेख लोकांपर्यंत पोचण्यासाठी वर्तमानपत्र छापण्याची गरज आहे. त्यासाठी मुद्रण यंत्र, अन्य सामग्री विकत घेऊ शकेल, हिशोब ठेवील, वृत्तपत्राचं वितरण करील आणि एकूणच हा उद्योग चालू ठेवील अशी व्यवसाय संघटना हवी.

तर आता जरा मुद्रणशाळेत जाऊन बघू या. या छापखान्यात खूप माणसं काम करीत असतात. जुन्या उर्दू वर्तमानपत्रात छापखान्यामध्ये हस्ताक्षर कुशल देखील असत. अजूनसुध्दा आधुनिक प्रतिरूप मुद्रण प्रक्रियेमध्ये या हस्ताक्षर कुशलांचा उपयोग होतो. हे लोक प्रत्येक पान छापण्यापूर्वी लिहून काढतात. छापखान्यात मुद्रित



हस्ताक्षर कुशल कामात व्यग्र

तपासनीस असतात. त्यांना बऱ्याच वेळा अनेक लोक फारशी किंमत देत नाहीत. पण प्रत्यक्षात वर्तमानपत्रामध्ये हे लोक फार महत्वाचे असतात कारण जितकं काळजीपूर्वक ते आपलं काम करतील तेवढ्या कमी चुका वर्तमानपत्रात होतील आणि लोकांचा तेवढा विश्वास वाढत जाईल.

बातम्या पुरविणारे लोक आणि त्या लोकांच्या घरांपर्यंत नेणारे लोक यांना विसरुन चालणार नाही. वृत्तपत्राच्या मुख्य कचेरीत वार्ताहर असतात, त्याशिवाय जिल्ह्याच्या ठिकाणी आणि काही वेळा खेड्यावरही वृत्त प्रतिनिधी असतात. ते टपालानं किंवा तारेनं बातम्या पाठवितात. काही वेळा ते टेलिफोनही करतात. सगळेच वर्तमानपत्रात पूर्णवेळ काम करतात असं नाही. ते एरवी शिक्षक, वकील, दुकानदार असा काही व्यवसाय करत असतात, आणि फुरसतीच्या वेळात पत्रकार असतात. यातून त्याना थोडे जादा पैसेही मिळतात.

काही छोट्या गावांत पेपरविक्रेते हेच त्या वर्तमानपत्राचे वृत्तप्रतिनिधी असतात. केरळमध्ये तर खरोखरीच असं घडतं. कारण भारतातल्या इतर कोणत्याही राज्यापेक्षा केरळात साक्षरता अधिक आहे आणि तेथे वर्तमानपत्रांचा खप तीन ते चार लाखपर्यंत असतो.

आज अर्थातच या व्यवसायातही अधिकाधिक विशेषीकरण होत आहे. वर्तमान-पत्रात आज सजावट करणारे असतात. त्यांचे काम हेच की वर्तमानपत्राच्या प्रत्येक पानाचं रंगरूप अगदी तपशीलात जाऊन पाहायचं. वर्तमानपत्रात छायाचित्रकार व छायाचित्रसंपादक असतात. त्यांचं रोजचं काम एवढंच की हजारो छायाचित्रं पाहायची





छोटे साचे (मॅट्रिक्स)

आणि त्यातून उद्याच्या अंकासाठी योग्य अशी काही निवडायची. विज्ञान, वास्तुकला, संरक्षण, पर्यावरण, शिक्षण, धर्म या क्षेत्रात विशेष ज्ञान बाळगणारे लेखक वा प्रतिनिधी प्रत्येक वर्तमानपत्राच्या हाताशी असतातच.

### तंत्रज्ञान

संपादकीय दालनातील शांततेपासून दूर तळमजल्यावर वा तळघरात असतो छापखाना. जहाजाच्या एंजीनरुम सारखी याची काही प्रमाणात अवस्था, तर काही प्रमाणात याचे रूप कारखान्याचे. येथील यंत्रं वाट पहात असतात वर्तमानपत्राच्या जुळणी झालेल्या पानांची.

छापखान्यातील लायनो टाईप जुळणी यंत्र म्हणजे धातूचे राक्षसच असतात. या छोट्या धातूशाळाच. त्यावर धातूचे मोठे तुकडे रांगत असतात. ते वितळतात आणि

लायनोटाईप यंत्र

रस तांब्याच्या टायपात जाऊन बसतो. वार्ताहरांनी आपला मजकूर लायनोटाइप यंत्रावर जुळणी करण्यास दिला की ही कारवाई सुरू होते. या यंत्रावरील अक्षररचना टाइपरायटरसारखीच असते. फक्त ऑपरेटर कळा दाबतो तेव्हा छोटे साचे (मॅट्रिक्स) जुळवले जातात आणि वितळलेल्या शिशावर ओळीच्या आकारात दाबले जातात. त्यातून एकसंध ओळ तयार होते. म्हणूनच तर या प्रक्रियेला लाइन ओ टाइप असं नाव दिलं गेलं.

अशा ओळीमागून ओळी एकत्र केलेला मजकूर एका मोठ्या लोखंडी चौकटीत पूर्वनियोजित रचनेप्रमाणे पक्का बांधला जातो. त्याला पान म्हणतात. त्यामध्ये शीर्षकांसहीत सर्व धातूमध्ये असते. या पानावर एक विशिष्ट प्रकारचा पुठ्ठा यंत्रामध्ये दाबला जातो. त्यास म्हणतात फ्लाँग. यावरच धातूच्या त्या पानाची प्रतिमा उमटते. तो फ्लाँग अर्धवर्तुळाकार वाकवला जातो. आणि त्यावर वितळवलेलं शिसं ओतलं जातं. हा सुमारे तीस किलो वजनाचा धातूचा पत्रा छपाई यंत्राच्या रूळांवर बसवला जातो. दुसऱ्या टोकाला न्यूजप्रिंट कागदाच्या मोठमोठ्या गुंडाळ्या यंत्रात अडकवून ठेवलेल्या असतात. यंत्र सुरु झालं की धाड धाड आवाज करीत तासाला साठ ते सत्तर हजार प्रती या वेगानं वर्तमानपत्र छापून तयार होऊ लागतं.

छपाईचा आणखी एक मार्ग म्हणजे प्रतिरूप मुद्रण. येथे मूळ पानाची निगेटिव तयार केली जाते. त्यापासून जस्त किंवा ॲल्युमिनियमची ऑफसेट प्लेट तयार करतात. त्यानंतर जो भाग छापायचा तो पाणी किंवा इतर रसायनांनी धुतात. या प्रक्रिये पाठिमागे शाईचा स्वीकार किंवा धिक्कार ही कल्पना असते.

वर्तमानपत्रं छापली जातात तो एक खास प्रकारचा कागद असतो. त्याला न्यूजप्रिंट म्हणतात. हा कागद जलशोषक असतो. त्यावर शाई जलद वाळते, आणि छपाई चालू असताना पसरत नाही.

या यंत्रात छपाईखेरीज कटिंग, एकत्र करणं, घड्या घालणं आणि प्रती मोजणं ही कामंसुध्दा होतात.

या ठिकाणी खूपच आवाज आणि धांदल गडबड असते. कामगार अक्षरशः कागदाचे डोंगर इकडूनचे तिकडे करीत असतात. धातूची पानं यंत्रावर चढविण्यापासून सर्व कामं लगबगीनं चालू असतात. प्रत्येकाची धावपळ असते ती दुसऱ्या दिवसाचा 'पेपर' वेळेवर यावा म्हणून.



वर्तमानपत्राच्या कागदांची गुंडाळी



(मॅट्रिक्स)

वृत्तपत्रछपाईमधील हा गडबड-गोंगाट लौकरच नाहीसा होईल. वीजाणू तंत्रावर चालणाऱ्या संपादकीय खोल्यांतील मंद आवाज एवढीच वर्तमानपत्राची खूण राहील. आपल्या सर्वात मोठ्या दैनिकांपैकी एक 'दि हिंदू' मध्ये आधीच फोटो टाइपसेटींग यंत्रं आहेत. शिवाय तो फॅसिपाइल पध्दतीनं छापला जातो. ही पध्दत रेडिओ फोटोसारखी आहे. यामुळे छपाई सुकर व अधिक जलद होते. या पध्दतीत पानाची प्रतिमा केंद्र कचेरीमधून कोईमतूर, बंगलोर आणि हैद्राबाद याठिकाणी पाठविली जाते.

वीजाणू क्रांतीमुळे इतर देशांतील वृत्तपत्र जगात फारच मोठे बदल झाले आहेत. नव्या पध्दतींनी कमी कष्टात वर्तमानपत्र प्रसिध्द करणं शक्य होत आहे. तीस मिनिटांत पंधरा पानांचं संपादन, जुळणी आणि उत्पादन होऊ शकतं आणि तुम्हाला वाचण्यासाठी वर्तमानपत्र तयार होतं. अजूनही वर्तमानपत्राचा आत्मा संपादकीय दालनच आहे. पण

किती फरक पडला आहे, पहा. आता वीजाणू साधनांनी गजबजलेली ही खोली आहे. प्रमुख उपसंपादक, उपसंपादक, सहसंपादक, पुढारी, मुद्रित तपासनीस ही सगळी कामं आता एकटा एक माणूस करु शकतो. पत्रकाराजवळ आता त्याच्या फोनलाच जोडलेला त्याचा स्वतःचा वीजाणू टाईपरायटर असेल, त्यावर तो बातमी टाईप करील ती परस्पर वीजाणू तंत्रावर चालणाऱ्या संपादकीय खोलीत मिळेल. उपसंपादक टी व्ही सारख्या पडद्यावर पाहून तिथल्या तिथे ती संस्कारीत करील आणि लगेच जुळणी संगणकाला ती पुढील कारवाईसाठी देईल. काही मिनिटांतच त्या बातमीचं मुद्रित त्याच्यासमोर झळकेल. वृत्त संस्थांच्या बातम्याही अशाच सरळ या संगणकास देता येतील. ज्यावर ही मुद्रितं दिसतात त्यांना म्हणतात व्हिज्युअल डिस्प्ले टर्मिनल. छपाई संगणकनियंत्रित फोटो टाइपसेटर्सच्या सहाय्यानं होते. उपग्रहामार्फत पानच्या पान वीजाणू प्रक्षेपण पध्दतीनं अथवा टिंब प्रक्षेपण पध्दतीनं (डिजिटल ट्रान्स्मिशन) धाडणं ही आणखी नवी पायरी आहे. लौकरच





व्हिडियो टर्मिनल मुद्रणजुळणी



कॉम्प्युटर आऊटपुट विभाग



संगणक नियंत्रित शाईचे फवारे न्यूजप्रिंटवर शाई फवारतील आणि प्लेटविना छपाई वास्तवात येईल.

पत्राची बांधणी





भारतातही हे बदल येत आहेत. परंतु आपल्या वर्तमानपत्रांत खूप माणसांना काम आहे आणि तंत्रवैज्ञानिक प्रगती साध्य केलेल्या देशांना गती ही जेवढी महत्वाची वाटते, तेवढी आपल्याला वाटत नाही.



# ५ व्यवस्थापन

अनेक छोट्या भारतीय वृत्तपत्रांत सत्ता एकाच व्यक्तीच्या हाती एकवटलेली असते – व्यवस्थापक आणि संपादक हा एकच माणूस असतो आणि बहुधा तोच मालकही असतो.

आज वृत्तपत्र मालकी आणि नियंत्रण यांचे अनेक नमुने आपल्यापुढे आहेत. ते आपण अमलात आणून पाहिले पाहिजेत. वर्तमानपत्रात काम करणाऱ्या लोकांची सहकारी संस्थाच ते चालवू शकेल. प्रकाशक आणि व्यवस्थापक यांनी चालवलेली वर्तमानपत्रे असतानाच वरील प्रयोग करून पाहता येईल.

संपादकीय कर्मचाऱ्यांखेरीज वर्तमानपत्र निघणं शक्य नाही. पण व्यवस्थापकीय कर्मचारी नसतील तर वर्तमानपत्र टिकणं अवघड आहे. बऱ्याच देशांमध्ये वर्तमानपत्र छापण्यासाठी जो कागद वापरला जातो त्या कागदाच्या किंमतीपेक्षा वर्तमानपत्राची किंमत कमी असते. वर्तमान पत्रात जाहिराती असतील तरच हे शक्य होतं. जाहिरातींमधून निर्मितीखर्च तर निघतोच, पण त्यातून संपादकीय व व्यवस्थापकीय वर्गाचे पगार देणं आणि वर्तमानपत्र फायद्यात चालविणं शक्य होतं.

व्यवस्थापकीय वर्गाचं एक महत्वाचं काम म्हणजे जाहिराती आणणं. हे काम जाहिरात खात्यामार्फत केलं जातं. या खात्याचे प्रतिनिधी छोट्या-मोठ्या जाहिरातदारांकडे जातात. जाहिरात देण्यासाठी त्यांची मनधरणी करतात, आपलं वर्तमानपत्र किती लोकांपर्यंत जातं आणि ते लोक कसे श्रेष्ठ आहेत, त्यांच्याकडे कसा आहे आणि म्हणून जाहिरात दिलेल्या वस्तू ते कसे खरेदी करु शकतील हे त्यांना पटवून देतात.

आणि या जाहिरातींमुळेच अमेरिकन वर्तमानपत्रांना एकशेवीस ते एकशेसाठ पानं रोज देणं शक्य होत. त्याचमुळे ब्रिटिश वर्तमानपत्रं रोज साठ ते ऐंशी पानं देऊ शकतात. अमेरिका आणि ब्रिटनमधील रविवारची वर्तमानपत्रं काही वेळा एक किलोपेक्षा जास्त वजनाची भरतात!

जाहिरातींमुळेच वर्तमानपत्रं तग धरु शकतात. जाहिराती कमी केल्या तर वर्तमानपत्राची किंमत पाच, सहा किंवा दहा पट सुध्दा ठेवावी लागेल. आणि फारच थोड्या लोकांना ती परवडू शकेल. रशिया, चीन, पोलंड आणि व्हिएटनामसारखे समाजवादी देश असं मानतात की जाहिराती हा अनाठायी खर्च आहे. ती वर्तमानपत्र जाहिराती स्वीकारत नाहीत. मग ती चालतात कशी? सरकारच वर्तमानपत्रांचं महत्व जाणून त्यामध्ये बराच पैसा घालतं. तेथील वर्तमानपत्रं खाजगी मालकीची नाहीत. कोणती तरी संघटना किंवा सरकारी संघटना वर्तमानपत्रं चालविते. सत्तारूढ पक्ष, शेतकरी संघटना, लष्कर किंवा युवक संघटना वर्तमानपत्रं चालविताना आढळतात.

सरकार हे स्वतः मोठं जाहिरातदार असतं. तशी तर वर्तमानपत्रावर त्यांची सत्ता असतेच. जाहिरातींचा फायदा आणि या प्रकारचा तोटा यांचा तोल साधणं अवघड असतं.

व्यवस्थापनाच्या इतरही जबाबदाऱ्या असतात. वर्तमानपत्राची विक्रीव्यवस्था त्यांनीच पहायची असते. ज्या गावात ते प्रसिध्द होतं त्या गावाच्या परिसरात विक्रीची सोय करावी लागते. हे अतिशय कठिण काम असतं, शिवाय जबरदस्त स्पर्धा असते. बाहेर अंधार असताना भल्या पहाटे वर्तमानपत्रांचे गठ्ठे घेऊन व्हॅन्स निघतात आणि तीनशे किलोमीटर अंतरापर्यंत ती वितरणासाठी नेऊन टाकतात. काही वेळा यासाठी

टॅक्सी भाड्यानं घेतल्या जातात. प्रतिस्पर्धी वर्तमानपत्राला मागे टाकण्यासाठी या व्हॅन्स आणि टॅक्सीज फार वेगाने दौडविल्या जातात. दक्षिणेतलं एक वर्तमानपत्र अन्य दाक्षिणात्य शहरांना विमानसेवेनं आपला माल पुरवित असे. त्या वर्तमानपत्राचं स्वतःचं विमानपथक होतं – प्रथमा हेरॉन जातीच्या विमानाचं आणि नंतर दोन इंजिनांच्या डीसी-३ डाकोटा विमानाचं.

वर्तमानपत्राचे गठ्ठे विशिष्ट ठिकाणी टाकले जातात. तेथून मग घाऊक वृत्तपत्रविक्रेते ते ताब्यात घेतात. तो पुढे किरकोळ विक्रेत्यांना ते देतो. त्यांचं काम म्हणजे ती वृत्तपत्रं वेगवेगळी करुन त्यावर नाव/पत्ते घालून ठेवायचे. मग वर्तमानपत्र टाकणारी पोरं ती घरोघरी पोचवतात. या पोरांचं जीवन मोठं खडतर असतं. थंडी, वारा, पाऊस, काही असो, त्याचा दिवस पहाटे ४ ला सुरु होतो. त्याला रविवार नाही की सुट्टी नाही. त्याला वर्तमानपत्र विकण्याबद्दल कमिशन मिळतं.त्याच्या कुटुंबाच्या उत्पन्नात ही बऱ्यापैकी भर पडते.

युरोपात बहुसंख्य लोक नाक्यावर जाऊन पेपर विकत घेतात. कामावर जाताना सकाळचं वृत्तपत्र आणि संध्याकाळी घरी परतताना सायंदैनिक विकत घ्यायचं हा तेथील बहुसंख्यांचा परिपाठ आहे. भारतात (आणि जपानमध्येही) वर्तमानपत्रं घरी टाकली जातात.

वर्तमानपत्र कसं असावं, त्यात काम असावं याबद्दल जगभर वेगवेगळ्या कल्पना आहेत. त्या त्या देशाच्या प्रगतीवर त्या अवलंबून आहेत. उदा. जपानमध्ये दूरदर्शनच्या पडद्यावर वर्तमानपत्र वाचायला मिळतं तर चीनमध्ये मोठ्या प्रमाणावर भित्तिपत्रं लावली जातात.

बहुतेक प्रगत देशांमध्ये वर्तमानपत्र प्रकाशन हा पोलाद, रसायने अथवा कापड या सारखा उद्योग मानला जातो. भारतात आपण द्विधा मनस्थितीत आहोत – म्हटलं तर हा उद्योग आहे वा नाही देखील. आपल्याकडे अनेक छोटी वर्तमानपत्रं आहेत. ती एका व्यक्तीच्या किंवा फार तर कुटुंबाच्या मालकीची असतात. त्यामुळे कुटुंब-व्यवसाय पध्दतीनं ती चालविली जातात. त्याचबरोबर आपल्याकडे काही फर्म्सही आहेत. मोठ्या उद्योगांप्रमाणे 'शास्त्रशुध्द व्यवस्थापन' करण्याकडे त्यांचा कल असतो.

# ६ उत्तम वर्तमानपत्र

वर्तमानपत्रात कोणते गुण असावेत या आधारावर आता आपण आपली वर्तमानपत्रं तपासून पाहूया. ते तपासण्यासाठी तुम्ही गुण देण्याची पध्दतही ठरवू शकता.

वर्तमानपत्राचं पहिलं पान म्हणजे दुकानाची दर्शनी बाजूच. त्यामुळे ते तयार करण्यात खूपसं संपादकीय कौशल्य खर्ची पडत असतं. त्यातील मुख्य बातम्या कोणत्या असाव्यात, त्या उत्तम तऱ्हेनं लिहिल्या जातात ना, त्यांची सजावट कशी करावी, त्यांच्यावरील संपादकीय संस्कार या सर्वांवर बारीक नजर असावी लागते. एका शहरात दोन वृत्तपत्रांमध्ये स्पर्धा असेल तर एकानं आपण दुसऱ्यासारखे दिसणार नाही याबाबत खबरदारी घ्यायला हवी. वृत्तसंस्थेनं पुरविलेली उघड बातमी पहिल्या पानासाठी न निवडता शक्य तर आपल्याच वार्ताहरांमार्फत एखादी खास बातमी मिळवून ती पहिल्या पानावर देण्याचा वर्तमानपत्राचा प्रयत्न असावा. हे नच जमलं तर त्या दिवशीची मुख्य बातमी वेगळ्या दृष्टिकोनातून सादर करावी.

'वर्तमान'पत्र असल्यानं त्यामध्ये बातम्या असल्याच पाहिजेत. ती बातमी कोणत्याही बाजूला झुकलेली नसावी. ती नेमकी आणि सरळ लिहिलेली असावी. ज्या ठिकाणाहून वर्तमानपत्र प्रकाशित होतं तेथील बातम्या त्यात असाव्यात. मग तो प्रदेश, ते राज्य, तो देश आणि जगभरच्या महत्वाच्या बातम्या त्यात याव्यात. अर्थात हे प्रमाण बातमीच्या

महत्वानुसार ठरवलं जावं, पण वर्तमानपत्रामध्ये ही 'मिसळ' छान जमलेली असावी. शांतता, युध्द किंवा विज्ञान आणि सांस्कृतिक प्रगती या क्षेत्रामध्ये जगभर सारखं काही ना काही घडत असतं. या सगळ्या घटनांविषयी वाचकाला जाणून घ्यायचं असतं. त्याच्या या औत्सुक्याच्या आधारावरच कोणती बातमी किती प्रमाणात द्यायची हे ठरवावं लागतं. बातम्या मिळणं ही खर्चिक बाब आहे. त्यामुळे विविध प्रकारची वृत्तं वर्तमानपत्रात देणं सोपं काम नसतं. वर्तमानपत्राला ठिकठिकाणी किमान अर्धवेळ तरी वृत्तप्रतिनिधी ठेवावे लागतात, किंवा एकाद्या उत्तम वृत्तसंस्थेची सेवा त्याला मिळवावी लागते. त्याचबरोबर वृत्तलेख देणाऱ्या संस्था असतात, त्यांच्याशीही काही व्यवस्था ठरवावी लागते.

वर्तमानपत्रात दुसरी बघायची गोष्ट म्हणजे त्यातून व्यक्त होणारी मतं. आजचं जग आणि आजचा भारत यापुढील प्रश्न इतके गुंतागुंतीचे आणि अवघड आहेत की वर्तमानपत्रांनी ते सोपे करून सांगणं हे त्यांचं एक कर्तव्य होऊन बसतं. यामुळे वाचकाला ते समजावून घेऊन स्वतःचे निष्कर्ष काढणं शक्य होतं.

बहुसंख्य वर्तमानपत्रांत संपादकीय पान असतं. हेच सहसा मत-मतांतराचं पान असतं. याच पानावर संपादकीय स्तंभातून वर्तमानपत्र आपली भूमिका मांडत असतं. उत्तम अग्रलेख सोप्या पध्दतीनं आणि समजावून देण्याच्या भाषेत लिहिलेले असतात. अग्रलेखातील विशिष्ट भूमिकेशी तुम्ही कदाचित सहमत होणार नाही, परंतु विचार करायला लावून असहमत होईपर्यंत तुम्हाला आणण्यात जरी वर्तमानपत्राच्या अग्रलेखाला यश आलं तरी त्याचं सार्थक झालं असं म्हणता येईल.

अग्रलेख आणि संपादकीय टिकाटिप्पणी खेरीज वर्तमानपत्रात आणखीही काही मतमतांतरं व्यक्त करणारे स्तंभ असतात. हे काही वेळा वर्तमानपत्रातल्या मंडळींनीच लिहिलेले असतात. काही वेळा बाहेरच्या विशेषज्ञांकडून ते लिहून घेतले जातात. या स्तंभामध्ये केवळ भाष्यच असतं असं नाही तर बऱ्याच वेळा त्या घटनेची अधिक माहिती असते. 'साखळी स्तंभ' नावाचा आणखी एक प्रकार काही वर्तमानपत्रांत असतो. या प्रकारात काही पत्रकार मंडळी एकाच वेळी एक स्तंभलेख अनेक वर्तमानपत्रांना देऊ करतात आणि ती वर्तमानपत्रं योग्य पैसे देऊन तो लेख छापतात. अमेरिकेमध्ये असे वेगवेगळ्या विचारांचे चार-पाच स्तंभलेख छापले जात असल्याची उदाहरणं आहेत. या संबंधात असंही बोललं जातं की असे लेख छापून ती वर्तमानपत्रं स्वतःची संपादकीय भूमिका घेण्याचं टाळतात.

## चीनी नामों के गलत उच्चारण

विदेशी नामों को हिन्दी (देवनागरी लिपि) में लिखते समय बहुधा अंग्रेजी का अनुसरण किया जाता है जो सिद्धान्ततः गलत है। चीनी नामों का देवनागरीकरण भी अंग्रेजी के अनुसार किया जा रहा है जिसके कारण चीनी नाम हिन्दी में बहुत अधिक विकृत हो गए हैं। उदाहरण के लिए, पेईचिङ, तङ, काओ को क्रमशः बीजिंग, देंग, काओ लिखा जा रहा है। कितना अधिक अन्तर है। दूरदर्शन में भी यही भ्रष्ट उच्चारण सुनने को मिलता है।

यदि केवल इतना ध्यान रखा जाए कि चीनी भाषा में केवल अघोष अल्पप्राण तथा अघोष महाप्राण ध्वनियां होती हैं और घोष ध्वनियां (अल्पप्राण तथा महाप्राण दोनों) नहीं होती हैं तो चीनी भाषा का ज्ञान न होते हुए भी बहुत-सी अशुद्धियों को रोका जा सकता है, अर्थात चीनी नामों में प्रयुक्त अंग्रेजी वर्णमाला के 'बी', 'डी', 'जी' वर्णों के स्थान पर हिन्दी में 'प', 'त', 'क' लिखना चाहिए, तथा 'पी', 'टी', 'के' के स्थान पर 'फ', 'थ', 'ख' लिखना चाहिए। इसके अतिरिक्त 'एक्स' के स्थान पर 'श' तथा [illegible] के संयुक्त रूप के स्थान पर 'च' लिखा जाना चाहिए।

अन्य भाषाओं के नामों को यथासंभव सही-सही लिखना भी उतना ही आवश्यक है जितना कि वर्तनी के अन्य नियमों का पालन।

—प्रेम चन्द पांडे
डाई-८१ हौज खास
नयी दिल्ली - १६

### रावली पुल के न खुलने से रोष

बिजनौर के पास गंगा पर निर्मित रावली बैराज जून ८२ में बनकर तैयार हुआ। पिछले दिनों जिलाधिकारी बिजनौर ने पुल को अनौपचारिक रूप से खोलने की घोषणा भी की थी लेकिन उसका भी कुछ नहीं हुआ। ३५ करोड़ रुपए की लागत से बना यह पुल पिछले तीन महीने से उद्घाटन की प्रतीक्षा कर रहा है। सामान्य टोल से ही इस पर [illegible] लाख रु. प्रतिमाह की हानि हो रही है। पिछले ८ महीने से [illegible] ने भी लिंक मार्ग पर काम बंद कर रखा है।

## चिट्ठियां

### हैदराबाद में दंगे

श्री सिद्दीकी का यह कहना (९ अक्तूबर) बिलकुल सही है कि कुछ मुसलमान अपने को राष्ट्र की मुख्य धारा में नहीं मिला पाये हैं। हिन्दू-मुस्लिम साम्प्रदायिक दंगे सिर्फ उन्हीं शहरों में क्यों होते हैं, जहां मुसलमान आबादी में हिन्दुओं से अधिक होते हैं। क्या कारण है कि दंगे सिर्फ [illegible] रहते हैं।

जब-जब भारत-पाकिस्तान क्रिकेट या हॉकी मैचों में पाकिस्तान की टीम विजयी होती है, भारत में बसे, मुख्य धारा में न मिल सकने वाले मुसलमान, अपने-अपने घरों में दिये जलाते हैं तथा मिठाइयां बांटते हैं।

कुछ मुसलमान अपने को राष्ट्र की मुख्य धारा में न मिला [illegible]

हिन्दी वर्तमानपत्रातील वाचकांचा पत्रव्यवहार

हे मत-मतांतराचं झालं. पण दृष्टीकोन, भूमिका ही बाब अजून आपण पूर्ण केलेली नाही. वर्तमानपत्राचा एक अत्यंत महत्वाचा भाग म्हणजे वाचकांचा पत्रव्यवहार. यावरुन वर्तमानपत्र स्वतःच्या कामगिरीबाबत आखाडे बांधू शकतं. तसंच (सरकार, विद्यापीठं, नगरपालिका) यासारख्या अधिकारी संस्थांना लोकभावना काय आहे हे या पत्रव्यवहारावरुन कळतं. बऱ्याच देशांमध्ये अलिकडे अलिकडे या पत्रव्यवहारास वर्तमानपत्रामध्ये वाढत्या प्रमाणावर जागा मिळू लागली आहे.

वर्तमानपत्राचं संपादकीय पान पाहून त्याचं स्वरूप आणि त्यातील चैतन्यशीलता ठरविता येते. त्यातील अग्रलेख जड आणि शब्दबंबाळ असतील, लेख निरस असतील आणि पत्रव्यवहारामध्ये बससेवा किंवा अशा संबंधातील तक्रारीच असतील तर ते संपादकीय पान कंटाळवाणे होईल, आणि वाचक ते उलटून जाण्याचीच शक्यता अधिक.

आता मनोरंजनाची बाजू बघू या. युध्द, क्रांती, मंत्र्यांची भाषणं आणि भाववाढ यासंबंधीच्या बातम्या म्हणजे वर्तमानपत्र नव्हे. वर्तमानपत्र हे जीवनाचं प्रतिबिंब असलं पाहिजे. जीवनात मौजमजा असते, खेळ असतात, दु:ख असते आणि चिंताही असतात. गावातील सिनेमा, नाटकं, तमाशा, प्रदर्शनं यासंबंधातील पुरेशी माहिती वर्तमानपत्रात असावी. त्यामध्ये आकाशवाणी आणि दूरचित्रवाणी यांच्या यांवरील कार्यक्रमांचा तपशील हवा. यापैकी काय काय निवडून त्याचा आस्वाद घ्यावा, हेही वर्तमानपत्रानं सुचविलं तर फारच चांगलं.

**इंग्रजी वर्तमानपत्रातील चित्रपट-जाहिराती**



## Kiwis hold Pakistan



### Australia beat Spain

## Romania lead in team event



## US relay quartet thwarts Gross



## Stylish Brazil sound warning

## What's on at LA







**वर्तमानपत्रातील क्रीडावृत्त**

मनोरंजनामध्ये याशिवायही आणखी बऱ्याच गोष्टी येतात - बागकाम, मोटारदुरुस्ती, ब्रिज, खेळ आणि भटकंती. यासारख्या छंदाबाबत वर्तमानपत्रात मजकूर येऊ शकतो. उत्तम वर्तमानपत्रात यासारख्या सर्व छंदांना जागा असावी आणि वर्तमानपत्राच्या राजकीय बाजूपासून ते स्तंभ अत्यंत कठोरपणे बाजूला ठेवलेले असले पाहिजेत.

हिंदी, बंगाली, गुजराती आणि अन्य काही भाषांत वर्तमानपत्र वाङमयाला बरंच महत्व देताना दिसतात. कविता, लघुकथा आणि वाङमयीन समीक्षा यांना या वर्तमानपत्रांत बरीच जागा दिली जाते. या दैनिकांच्या रविवार पुरवणीतून बऱ्याच नव्या लेखकांचा 'उदय' झाल्याचं दिसून येतं.

आणि आता क्रीडाविभाग. लक्षावधी लोकांना खेळांमध्ये आवड असते. केवळ तरूणच नव्हे तर आबालवृध्दांना ही ओढ असते. स्त्रियासुध्दा यात मागे नसतात आणि आता क्रीडाप्रकार तरी किती झालेत! ॲथलेटिक्स, धनुर्विद्या, फूटबॉल, क्रिकेट आणि हॉकी इथपासून ते वजन उचलणे, समुद्र पर्यटन आणि गोल्फपर्यंत अनेक खेळ. तेव्हा वर्तमानपत्राचा चांगुलपणा ठरविण्यासाठी गुण देताना या विभागासाठी भरपूर गुण ठेवा. खेळांची वर्णनं कशी आहेत? कोणकोणते क्रीडाप्रकार त्यात समाविष्ट झाले आहेत? लोकांना स्वतःचं क्रिडाकौशल्य सुधारण्यासाठी काय प्रकारचे पाठ वर्तमानपत्रात असतात वगैरेच्या आधारे याबाबतीतील त्याची उपयुक्तता आणि गुणवत्ता ठरविता येते.

'पैशा'साठी तुमचे काही गुण राखून ठेवा, कारण फार थोडी भारतीय वर्तमानपत्रं या एका गोष्टीची दखल घेतात. लोकांनी पैशाचं काय करावं, त्यांनी त्यांची बचत कोठे गुंतवावी, त्यांनी विमा उतरवावा का, त्यांनी निवृत्तीसाठी काय तरतुद करावी, आजारपण, वृध्दत्व या काळातील आर्थिक तरतुदी कशा असतात अशा हजारो गोष्टी. यासंबंधात मोकळेपणानं, स्पष्टपणे आणि सोपेपणानं लिहायला हवं. लोकांना त्यातून स्पष्ट सूचना मिळाव्या. भारतामध्ये (द एकॉनॉमिक टाइम्स, द फिनान्शियल एक्सप्रेस आणि द बिझनेस स्टॅंडर्ड ही) तीन अर्थविषयास वाहिलेली दैनिकं प्रकाशित होतात. सरकारचे निर्णय, घोषणा आणि त्यांचे व्यापारउद्योगावर होणारे परिणाम, तसंच सरकारी धोरणावरील व्यापार-उद्योगाची प्रतीक्रिया अशा बातम्यांपुरतीच ही तीन अर्थविषयक दैनिकं मर्यादित दिसतात.

वेगळ्या शब्दात सांगायचं तर वर्तमानपत्राची गुणवत्ता तुम्ही जनजीवनाच्या तुलनेत पहा. सर्वसामान्य भारतीय माणसाला ज्या गोष्टींमध्ये विशेष आस्था व रस आहे त्यांची एक यादी करा आणि मग त्यापैकी वर्तमानपत्रात काय आलेलं दिसतं ते तपासून पहा. रविवारच्या अंकात तर हे प्रकर्षानं पहायला हवं. या दिवशी लोकांना जास्त वेळ असल्यानं वर्तमानपत्रांच्या पुरवण्या असतात. काही वर्तमानपत्रं त्यास 'साप्ताहिक' म्हणतात, व त्यामध्ये अनेक प्रकारे रसपूर्णता आणतात.

वर्तमानपत्रामध्ये छायाचित्रं आणि रेखाकृति याही वैशिष्ट्यपूर्ण असायला हव्यात. काही भारतीय वर्तमानपत्रांनी आपल्या पानांची रचना अतिशय आकर्षक ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. पण ही प्रयोगशीलता अपवादात्मक. बहुतेक भारतीय वर्तमानपत्रं मांडणी आणि सजावट या दृष्टीनं मंदच असतात. मात्र आता बऱ्याचशा भारतीय वर्तमानपत्रांत प्रतिरूप मुद्रण तंत्र वापरलं जात असल्यानं वर्तमानपत्रांच्या पहिल्या पानांना (किंबहुना सर्वच पानांना) तजेला आलेला दिसतो.

# ७ आजची अवस्था

भारतातील आजची खरी अवस्था काय आहे ते पाहूया. आपली वर्तमानपत्रं राजकारणात अधिक गुंतून गेलेली दिसतात. ते तर आपल्या जीवनाचं एक अंग आहे. पण त्याला वर्तमानपत्रात स्तंभच्या स्तंभ जागा दिलेली दिसते. क्रीडावार्तांना बऱ्यापैकी जागा वर्तमानपत्रांत दिली जाते, पण पुरेशी नाही. आणि आपल्याकडे केवळ क्रीडाविषयास वाहिलेलं दैनिक नाही. इतर देशांत तशी ती आहेत. आपल्या देशात क्रीडाविषयक काही साप्ताहिकं मात्र आहेत. पर्यटन, अर्थव्यवहार आणि आरोग्य या विषयांनादेखील भारतीय वर्तमानपत्रांत तुटपुंज स्थान असतं. खरं तर मानवी जीवनातला विरंगुळ्याचा काळ आणि त्या वेळात त्यानं काय करावं याबाबत फार कमी लक्ष आपल्या वर्तमानपत्रांनी दिलेलं असतं. त्यात कुशल नजर तर नसतेच.

बऱ्याच वर्तमानपत्रांचे राज्याच्या राजधानीत देखील वृत्तप्रतिनिधी नसतात. एवढंच काय कलकत्ता, मद्रास, मुंबई, दिल्ली या चार महानगरांतदेखील वर्तमानपत्रं आपला प्रतिनिधी ठेऊ शकत नाहीत. स्वाभाविकच परराज्यातील बातम्या फारशा असत नाहीत आणि जगाच्या बातम्या तर पुसटच असतात. त्याचं महत्व विशद करुन सांगण्याची काळजी घेतलेली नसते.

आधी नमूद केलं त्याप्रमाणे आपली भाषिक वर्तमानपत्रं वाङमयात तर रस घेतातच, पण त्यांचा दुसरा आस्थेचा विषय म्हणजे चित्रपट. सर्वसाधारण भारतीयाच्या

जीवनातच चित्रपटांना असाधारण स्थान आहे, आणि म्हणून आपली वर्तमानपत्रं चित्रपटविषयक बातम्यांना, सिनेनट-नट्यांविषयीच्या गप्पागोष्टींना भरपूर जागा देतात.

शिवाय, आपल्या वर्तमानपत्रांचा दर्जा देशभरात वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळा दिसतो. याचं कारण येथे प्रशिक्षणाची योग्य सोय नाही. आताआतापर्यंत आपल्या देशात वृत्तपत्रविद्या प्रशिक्षणाच्या शाळाच नव्हत्या. ही महत्वाची उणीव चिंताजनकच म्हटली पाहिजे,कारण वर्तमानपत्रासारख्या जनसंपर्क साधनाचा लोकांच्या मनावर फार प्रभाव पडत असतो. ब्रिटन आणि फ्रान्स या दोन्ही ठिकाणी पत्रकार प्रशिक्षणाचा खर्च उचलण्याचं बंधन वृत्तपत्र उद्योगावर कायद्यानं आहे. रशिया, पोलंड, पूर्व जर्मनी आणि हंगेरी या समाजवादी देशांत पत्रकारिता-प्रशिक्षण हे आवश्यक मानलं जातं आणि त्याची व्यवस्थाही उत्तमप्रकारे केली जाते.

वेगवेगळ्या वर्तमानपत्रांद्वारे लोकांच्या वेगवेगळ्या अपेक्षा पूर्ण व्हाव्या हे स्वाभाविकच आहे. एखाद्या दुकानदाराला क्रिकेटमध्ये अफाट रस असेल तर तो, ज्या वर्तमानपत्रात उत्तम क्रीडावार्ता येतात ते वर्तमानपत्र विकत घेईल. उलट एखाद्या अर्थतज्ञाला अर्थविषयक बातम्या आणि लेख यामध्येच रस असेल. त्यामुळे ज्या प्रकारचा वाचकवर्ग हवा असेल त्याप्रमाणे वृत्तपत्राचं स्वरूप आणि सादरीकरण बदलत असतं. पण हे स्वरूप बाजूला ठेवलं तर सर्व वर्तमानपत्रांनी बातम्या बिनचूक दिल्याच पाहिजेत, त्यामधून त्यांचा पक्षपात व्यक्त होता कामा नये. मतप्रदर्शनसुध्दा विचारपूर्वक आणि शांतपणे केलेलं असावं

वर्तमानपत्राचं मूल्यमापन कसं करायचं हे आता तुम्हाला कळून चुकलं आहे. त्यामुळे कोणतं वर्तमानपत्र बरं आणि कोणतं वाईट हे तुम्हाला ठरविता येईल. तेव्हा तुमच्यासमोर असलेल्या वर्तमानपत्रांची कठोर चिकित्सा करा. तुमच्या गुणकसोटीला एखादं वर्तमानपत्र उतरलं नाही तर त्याची टीका करण्यास नाही.

'पीत पत्रकारिता' नावाचा एक शब्दप्रयोग वारंवार ऐकू येतो. त्याचा अर्थ वाईट पत्रकारिता. पण असा शब्दप्रयोग करताना आपण काळजीपूर्वक तपासणी केली पाहिजे. बऱ्याच वेळा वर्तमानपत्रांतून ज्यांच्यावर टीका होते, असे लोक त्या त्या वर्तमानपत्रावर पीत पत्रकारितेचा आरोप करतात. काही वेळा काही सरकारी कारवायांचा तपास करुन त्यातील अनिष्ट गोष्टींवर एखाद्या शोधक वार्ताहरानं प्रकाशझोत टाकला तर सरकार त्या वर्तमानपत्रावर पीत पत्रकारिता अथवा बेजबाबदार पत्रकारिता असा काही आरोप करते.

पीत पत्रकारितेचा सर्वसाधारण अर्थ स्पष्ट आहे. जीवनाच्या गर्हणीय बाजूवर जेव्हा पत्रकार लक्ष केंद्रित करतात आणि गुन्हेगारी, हाणामारी व लैंगिकता याबाबत अधिक गोष्टी प्रकाशित करतात तेव्हा त्यास पीतपत्रकारिता म्हणतात. त्यामध्ये गुन्हेगारांना त्यांची जीवनकथा वर्णन करण्यास आवर्जून सांगितलं जातं, चित्रपट नटांना त्यांचं खाजगीजीवन उघडं करुन सांगण्यास प्रोत्साहन दिलं जातं किंवा काही वाईटसाईट छापून पैसे करण्याकडे वृत्ती दिसते.

ती थांबणार कशी? अश्लीलता, बदनामी, वगैरे संबंधी या देशात काही कायदे आहेत. पण पीत पत्रकारिता त्यामार्गानं नाहीशी करता येणार नाही आणि केलीही जाऊ नये. अविष्कार स्वातंत्र्य व टीका स्वातंत्र्य हे हक्क अबाधित राखण्यासाठी पीत पत्रकारिता सहन केली पाहिजे. अधिक कायद्यांमुळे प्रामाणिक टीकेवर देखील बंधनं येतील. पीत पत्रकारिता रोखण्याचा एक मार्ग म्हणजे वृत्तपत्रांनी स्वतःची एक संघटना तयार केली पाहिजे, जी वाट चुकणाऱ्या वर्तमानपत्रांना वेळीच इशारा करील. भारतासहित अनेक देशांत असे प्रयोग झाले आहेत, परंतु त्यांचं यश फार मर्यादित आहे.

# ८ भविष्यकाळ

आता वर्तमानपत्रांविषयी तुम्ही बरंच काही ऐकलं आहे. वर्तमानपत्रं काय आहेत हेही तुम्हास कळून चुकलं आहे. तर तुम्हाला एक प्रश्न विचारायचा आहे : तुम्हाला एखाद्या वर्तमानपत्रात काम करुन पत्रकार व्हावसं वाटतंय का?

पत्रकारितेबद्दल समाजामध्ये आकर्षण आहे. जवळजवळ दर आठवड्याला काही तरूण मुलं माझ्याकडे येऊन आपली पत्रकार होण्याची इच्छा बोलून दाखवतात. थोरामोठ्यांच्या भेटीगाठी, मोठमोठे निर्णय घेतले जात असताना आतल्या वर्तुळात असणं, आणि जंबोजेट आणि/किंवा छोट्या दो इंजिनाच्या विमानातून दूर प्रवासाची संधी... वर्तमानपत्रात काम करणाऱ्या माणसांच्या बाबतीत हे किती सहजशक्य आहे व असतं. पण खूपशी पत्रकारिता ही कष्टदायक आणि हमालीवजा कामानं भरलेली आहे. पत्रकारितेतसुध्दा पडद्यामागची कामं खूप असतात.

तरीसुध्दा पत्रकारितेची एक खासियत आहे. स्वार्थत्याग आणि निर्भीडपणा हे दोन गुण ठेवून जर वर्तमानपत्रं चालविली तर त्यांना खरोखरीच अन्यायाविरुध्द शस्त्र उपसता येणं शक्य आहे. गैरव्यवहार आणि अप्रामाणिकपणा ती उघड्यावर आणू शकतात. परंतु अशी खुली माहिती देण्यात अनेक अडथळे आहेत. वृत्तपत्र मालकांचे

## उपराज्यपाल के आदेश मजाक बने

# न नारे मिटे, न पोस्टर हटे

नयी दिल्ली, बुधवार (स)। गत चार अक्तूबर को एक खास आदेश जारी कर उपराज्यपाल ने दिल्ली के सभी सार्वजनिक निकायों को कड़ा निर्देश दिया था कि सार्वजनिक भवनों, पुलों, बसों आदि पर जो पोस्टर या नारे लिखे और लगे हैं, उन्हें दस दिन के भीतर साफ कर दिया जाए। लेकिन उस आदेश के १५ दिन बाद भी बसों और दीवारों आदि पर लिखे नारे या पोस्टर उपराज्यपाल के आदेश की खिल्ली उड़ा रहे हैं।

उपराज्यपाल ने डी. डी. ए., नगर निगम, नयी दिल्ली नगर पालिका, डी. टी. सी., लोक निर्माण आदि विभागों को ये आदेश जारी किए थे। लेकिन उनमें से किसी ने भी उनका पालन नहीं किया। डी. टी. सी. की बसों पर लिखे नामों और भद्दे वाक्यों को देखकर तो लगता है...



**हिंदी वर्तमानपत्रातील वृत्तपत्र-स्वातंत्र्याचा नमुना.**

स्वतःचे हितसंबंध असतात, काही गोष्टी गुप्त ठेवू इच्छिणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांची दडपणं, मोठमोठ्या व्यवसाय-आंतरराष्ट्रीय कंपन्या, कामगार संघटना, वैद्यकीय संस्था आणि अगदी धर्म संस्था यांचा जबरदस्त प्रभाव या सगळ्या गोष्टी वृत्तपत्रस्वातंत्र्याआड येऊ शकतात, पण तरीसुध्दा सत्य तेच मांडायचं, गैरव्यवहार उघड्यावर आणायचे, लोकांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडायची, योग्य गोष्टींना पाठिंबा द्यायचा आणि यामार्फत जनतेचा आदर संपादन करायचा या गोष्टी साधता येतातच. आशेच्या या किरणझोतामुळेच पत्रकार होण्यासाठी पिढ्यान् पिढ्या पुढे येतच आहेत.

काळाबरोबर आता पत्रकारिता हीसुध्दा इतर कोणत्याही व्यवसाय, नोकरीसारखं होऊ पाहात आहे. हे अटळ आहे कारण पत्रकारिता हा व्यवसाय आहे; बऱ्याच वेळा तो फार मोठ्या उद्योगाचं रूप धारण करतो. पण तरीसुध्दा या व्यवसायात असा एक जोम आहे की पत्रकार व्हावं असं स्वप्न अजूनही तरूणांना पडावं.

आपल्या सारख्या विशाल देशात अधिकाधिक लोकं साक्षर होत जातील तसतशी बातमी आणि बातमीपत्रं यांना अधिक मागणी राहील. (आता प्रत्येक शंभरातील तीस लोक लिहू-वाचू शकतात) तेरा कोटी घरांसाठी आज वर्तमानपत्राच्या फक्त नव्वद लाख प्रती छापल्या जातात. आता तरी आपली अठ्याण्णव ते नव्याण्णव टक्के वर्तमानपत्र शहरभागात वाचली जातात. कलकत्ता, मद्रास, मुंबई व दिल्ली या चार महानगरातच आपल्या दैनिकांचा निम्मा खप आहे. फार थोड्या खेड्यांत आज वर्तमानपत्र जातात. तेव्हा भारतीय पत्रकारितेच्या पृष्ठभागालाच आपण फक्त स्पर्श केलेला आहे हे उघड आहे.

पण वास्तव जाणीव असणं हे केव्हाही चांगलंच. हा आपला जीवनमार्ग आहे असं खरोखरीच, मनापासून वाटल्याखेरीज तुम्ही पत्रकारीतेत प्रवेश करु नका. काही वर्तमानपत्रं वगळली तर येथे पगार फार नाहीत, काम बरंच कष्टदायक आहे. तुम्हाला दुसरं कोणतंही काम करुन समाधान मिळणार नसेल तर आणि तरच तुम्ही पत्रकारिता हा व्यवसाय निवडा.

आणि एकदा का ही निवड तुम्ही केलीत की, येथे खळबळ, चित्ताकर्षकता सर्व काही आहे. तुम्हाला कामाचा दिवस आणि सुट्टीचा दिवस यातला फरकच कळणार नाही. तुम्हाला अनेक लोक भेटतात, मोठमोठ्या घटनांचे तुम्ही साक्षी असता, तुम्हाला बऱ्याच वेळेला प्रवास करण्यास मिळतो. आणि लेखनांतील आनंद तुमच्या वाट्याला येतो. प्रत्येक दिवस नाविन्याचा, नव्या धाडसाचा. तुम्हाला कोणती महत्वपूर्ण घटना उद्या बातमी स्वरूपात लिहायची आहे हे तुम्हास कधीच आधी कळणार नाही

देशात काय घडत आहे हे जाणून घेण्याचा प्रत्येकाचा हक्क आहे. हे लोकशाही राज्यव्यवस्थेत सरकारधरुन सर्वांना मान्य असते. देशात चाललं काय आहे हे लोकांना वृत्तपत्रात वाचता आलं पाहिजे, आकाशवाणीवर ऐकता आलं पाहिजे आणि दूरदर्शनवर दिसलं पाहिजे. सरकारची धोरणं सार्वजनिकरित्या जाहिर झाली पाहिजेत व त्यांची तशीच खुली चर्चा झाली पाहिजे. काही देशात लोकसभेचे कामकाज दूरदर्शन अथवा नभोवाणी यांवर साक्षात सादर केले जाते. विविध मते-मतभेद टिकले पाहिजेत, त्यांना स्थान मिळालं पाहिजे.

यामुळे जनसंपर्क साधनांवर विशेष जबाबदारी येते. दूरदर्शन आणि नभोवाणी गेल्या काही काळात झपाट्यानं पसरली असेल तर वर्तमानपत्रं आपल्या भूमीवर स्थिर आहेत. मात्र नभोवाणी-चित्रवाणी यांच्यामुळे वृत्तपत्रांचं स्वरूप बदललं आहे. हा बदल फारच मोठा आहे. वृत्तपत्रं अधिक विचारशील झाली आहेत त्यामध्ये विचारप्रदर्शन अधिक वाढलं आहे, वाचकांच्या विविध समूहांचा विचार वर्तमानपत्रं अधिक करू लागली आहेत. पण दूरदर्शन वा नभोवाणी हे वृत्तपत्रांना मागे सारू शकलेले नाहीत. अगदी छोट्या छोट्या वर्तमानपत्रांनीसुध्दा परिवर्तन कायम चालू राहाण्यासाठी फार मोलाची कामगिरी बजावली आहे. अगदी जुलमी राजवटीत देखील वर्तमानपत्रं गुप्रपणे चालूच राहिली.

म्हणूनच पत्रकारांवर खास जबाबदारी आहे. त्यांची जाणीव समृध्द हवी, ते निर्भीड हवेत आणि त्यांचे वर्तन समान बुध्दीचे असायला हवे.

Printed at Prabhat Publicity, New Delhi-110002